सैन्यातील धारातीर्थी पडलेल्या महाराष्ट्रातील अधिकारी/
जवान यांच्या विधवा/अवलंबितांना आर्थिक मदत देण्याबाबत -
शहीद हेड कॉन्स्टेबल मंगेश हरिदास रामटेके, जि. नागपूर.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मासैम-२०२१/प्र. क्र.२९३/का-२८(अर्थ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४/१२/२०२१.

**वाचा**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८, दिनांक ०२/०८/२०१९.
२) संचालक,सैनिक कल्याण विभाग,पुणे यांचे पत्र क्र.१६०२५/सैकवि-१६/२४२९, दिनांक ०३/१२/२०२१.

**प्रस्तावना**

युध्दात, युध्दजन्य परिस्थितीमध्ये, तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत / देशाबाहेरील मोहिमेत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सैनिकांच्या वारसांना तसेच देशातील सुरक्षा संबंधी मोहिमेत, चकमकीत धारातीर्थी पडलेल्या राज्यातील सीमा सुरक्षा बल व इतर तत्सम निमलष्कर दलातील सैनिकांच्या वारसांना संदर्भाधिन दिनांक ०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. १.०० कोटी इतकी आर्थिक मदत देण्यात येते.

**शासन निर्णय**

सैनिक कल्याण विभाग,पुणे यांनी दिनांक **०३ डिसेंबर, २०२१** च्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने,महाराष्ट्र राज्यातील धारातीर्थी पडलेले जवान **हेड कॉन्स्टेबल मंगेश हरिदास रामटेके** यांच्या अवलंबितांना पुढीलप्रमाणे आर्थिक मदत देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| नाव व पत्ता | शहीद दिनांक,मोहिम व ठिकाण | वारसांचे नांव व आर्थिक मदतीची रक्कम |
|---|---|---|
| नं. ०७०३७०६०५, हेड कॉन्स्टेबल मंगेश हरिदास रामटेके घर क्र. २५६६, वॉर्ड नं ०४, सिद्धार्थ नगर, भिवापूर, मु. पो. भिवापूर, तालुका भिवापूर, जि. नागपूर - ४४१२०१. | ०५ मार्च, २०२१ कोकहामेटा, जिल्हा नारायनापूर, छत्तीसगड येथे कार्यरत असताना माओवाद्यांनी गस्ती पथकावर आय.ई.डी स्फोट केल्याने शहीद. | श्रीमती राजश्री मंगेश रामटेके (वीरपत्नी) :- रू. ६०.०० लाख<br>श्रीमती विजया हरिदास रामटेके (वीरमाता):- रू. २०.०० लाख<br>श्री. हरिदास धोन्डुजी रामटेके (वीरपिता) :- रू. २०.०० लाख<br>घर क्र. २५६६, वॉर्ड नं ०४, सिद्धार्थ नगर, भिवापूर, मु. पो. भिवापूर, तालुका भिवापूर, जि. नागपूर - ४४१२०१. |
| | **एकूण** | **रुपये १.०० कोटी** |

२. शहीद **हेड कॉन्स्टेबल मंगेश हरिदास रामटेके** यांच्या अवलंबितास एकूण अनुज्ञेय (रू. १.०० कोटी) रक्कमेपैकी रु. ५०,००,०००/- (रु.पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम मुख्यमंत्री सहायता (कारगिल) निधीतून घेण्यात आलेल्या व राष्ट्रीयीकृत बँकेत सद्यस्थितीत गुंतविलेल्या रकमेच्या व्याजातून अदा करण्यात यावी.

३. शासन अनुदानातून द्यावयाच्या रकमेपोटी (उर्वरीत अनुज्ञेय रकमेसाठी) होणारा खर्च रु. ५०,००,०००/- (रुपये पन्नास लाख फक्त) हा मागणी क्र.ए-५ लेखाशीर्ष "२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६० - इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम,१०२-सामाजिक सुरक्षा योजनेखाली निवृत्तीवेतने, (००)(०४)देशांतर्गत/सुरक्षासंबंधी मोहिमेत-चकमकीत धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना आर्थिक मदत (२२३५ २६०८) ५०-इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजुर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रकरणी 'आहरण व संवितरण अधिकारी', म्हणून जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, नागपूर यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच धारातीर्थी पडलेल्या जवानांच्या विधवांना/अवलंबितांना द्यावयाची आर्थिक मदत ECS द्वारे देण्यात यावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मासैम २०१९/(प्र.क्र.६८)/२०१९/२८,दिनांक ०२/०८/२०१९ मधील मार्गदर्शक तत्वांचा अवलंब करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२४१८१२४६५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shivaji gulabrao gore

Digitally signed by Shivaji gulabrao gore
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=5a914ec7d72351a68d9f12e80317d7512bf6f19c34fee2557e3b3c882cce6f57,
pseudonym=FBF0A6AA972F003B5B0C7967AD7B6A3C4FA38DC8,
serialNumber=0FB38126D364A4D9F8873B7BC48B4369F1657CA258FC9C6479A27B4D539F409B, cn=Shivaji gulabrao gore
Date: 2021.12.24 18:13:34 +05'30'

**(शिवाजी गोरे)**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
३. महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परीक्षा व लेखा) महाराष्ट्र, मुंबई-३२
४. कमांडर, महाराष्ट्र-गुजरात एरिया मुख्यालय, कुलाबा, मुंबई ४०० ००५,
५. जिल्हाधिकारी, नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
७. संचालक, सैनिक कल्याण विभाग, पुणे ४११ ००६ ( ५ प्रती),
८. जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी, नागपूर,
९. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मुंबई - ३२,
१०. श्रीमती राजश्री मंगेश रामटेके (वीरपत्नी) -घर क्र.२५६६,वॉर्ड नं ०४,सिद्धार्थ नगर,भिवापूर,मु.पो.भिवापूर, तालुका भिवापूर, जि. नागपूर - ४४१२०१.
११. श्रीमती विजया हरिदास रामटेके (वीरमाता), घर क्र.२५६६,वॉर्ड नं ०४,सिद्धार्थ नगर,भिवापूर,मु.पो.भिवापूर, तालुका भिवापूर, जि. नागपूर - ४४१२०१.
१२. श्री. हरिदास धोन्डुजी रामटेके (वीरपिता) घर क्र.२५६६,वॉर्ड नं ०४,सिद्धार्थ नगर,भिवापूर,मु.पो.भिवापूर, तालुका भिवापूर, जि. नागपूर - ४४१२०१.
१३. निवडनस्ती २ प्रती